यवतमाळ जिल्हा कारागृह येथे
४ अतिरिक्त बराकी बांधण्यास
<u>प्रशासकीय मान्यता देण्याबाबत</u>

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी: ०१२०/६८/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई - ४०००३२, दिनांक : १९ जुलै, २००३

**वाचा:-** १) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक यांचे पत्र क्र. बीएलडी/४८१४/१८०८/४१२७/कक्ष:३ दि. १६.११.२००२.
२) वित्त विभाग:शा. नि. क्र. विअप्र:१०००/प्र.क्र.४६/२००१/विनिमय, दिनांक ११/७/२००२
३) क्रि. रि. पि. क्र. १७६/२००२, उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर

<u>शासन निर्णय:-</u> यवतमाळ जिल्हा कारागृह येथे कारागृहात कैद्यांची संख्या दुपटीने वाढली असल्यामुळे बंद्यांना उपलब्ध जागेत दाटीने ठेवावे लागते. त्यामुळे त्यांच्यात भांडण तंटे होऊन कारागृह परिसरात कायदा व सुव्यवस्थेचा व सुरक्षिततेचा प्रश्न निर्माण होतो. अशा प्रकारामुळे कैदी छोटे उर्फ मठाण याने न्यायालयात महाराष्ट्र शासन विरुध्द क्रिमिनल रिट पिटीशन क्र. १७६/२००२ दाखल केले असून या प्रकरणाच्या सुनावणीच्या वेळी न्यायालयाने कारागृहातील बंद्यांची पुरेशा जागेत ठेवण्याची व्यवस्था तात्काळ करावी असे शासनास आदेश दिले आहेत. त्या अनुषंगाने कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी शासनास विनंती केली आहे की, यवतमाळ जिल्हा कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी बांधण्यास शासनाने प्रशासकीय मान्यता मंजूर करावी.

२. यवतमाळ जिल्हा कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी बांधण्यास येणाऱ्या खर्चाची रु. १,३१,८७,८१५ (रुपये एक कोटी एकतीस लक्ष सत्याऐंशी हजार आठशे पंधरा फक्त) चे अंदाज पत्रक व बांधकामाचा नकाशा यास अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी मंजुरी दिलेली असून या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली आहे. सदर प्रस्तावातील कारागृह परिसरात काम करण्याकरिता केलेली २५% अधिक तरतूद संगणकीकरणाची, भाव वाढीसाठीची बाह्य विद्युतीकरणासाठीची व टर्न ओव्हर टॅक्सची सूचविलेली तरतूद रद्द करून सुधारित रु. ९९,१४,५६४ /- (रुपये नव्याण्णव लक्ष चौदा हजार पाचशे चौसष्ट फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास /अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम व वित्त विभागाने प्रशासकीय मान्यता दर्शविलेली आहे.

३. यवतमाळ जिल्हा कारागृह येथे चार अतिरिक्त बराकी बांधण्याच्या प्रस्तावाचा समावेश " केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना या (७५:२५ ) योजनेअंतर्गत केलेला असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन, शासन वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग - तीन या परिशिष्टातील अनु.क्र. ४, परिच्छेद क्रमांक २७(२) व रकाना ५ व ६ मधील अटींच्याअधीन राहुन आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र:१०००/प्र.क्र.४६/२००१/विनिमय दि. ११.७.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन शासन सदर प्रस्तावास व त्यासाठी येणाऱ्या रु. ९९,१४,५६४/- ( रुपये नव्याण्णव लक्ष चौदा हजार पाचशे चौसष्ट फक्त) च्या

खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्रं. बी.५ मुख्य लेखाशिर्ष २०५६- तुरुंग१०१, -तुरुंग केंद्र पुरस्कृत योजना (००) (०९) कारागृह सुधारणा योजना ( २०५६-०९८-९) योजनेत्तर/ दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा . तथापि यासाठी प्रत्यक्ष अर्थसंकल्पात तरतुद झाल्याशिवाय खर्च करु नये किंवा बांधकामास सुरवात करु नये.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या संमतीने तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २९२९/सीआर: ६८२/२००३ व्यय-८ दिनांक २१.६.२००३ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र.ना. माळी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य पुणे
कारागृह उप महानिरीक्षक ( मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक ( पूर्व विभाग) मध्यवर्ती कारागृह, नागपूर
अधिक्षक, यवतमाळ जिल्हा कारागृह
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नागपूर
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ
महालेखापाल महाराष्ट्र - १ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र-२( लेखापरिक्षा)( लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/यवतमाळ/नागपूर
वित्त विभाग( व्यय-८) मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमा-२) मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव,गृह विभाग ( पीयुडी-१ ) मंत्रालय समोर , मुंबई
निवड नस्ती.